“अतिउच्चदाब, उच्चदाब व लघुदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांना देण्यात येणाऱ्या वीजदर सवलत योजनेस मुदतवाढ देण्याबाबत.”

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२१/प्र.क्र.११८/ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २२ ऑगस्ट, २०२३.

**वाचा:-**

१. शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०१२/प्र.क्र.९१/ऊर्जा-३, दि.११ ऑक्टोंबर, २०१२.

२. शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०१६/प्र.क्र. ३८२/ऊर्जा-५, दि.३१ जानेवारी, २०१९.

३. शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२१/प्र.क्र. ११८/ऊर्जा-५, दि.२५ ऑगस्ट, २०२२.

४. महावितरणचे पत्र क्र.मु.अ.(वा)/उपसा जलसिंचन योजना/९१७९, दि.२७.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सुमारे ५३% लोकसंख्या उपजिविकेसाठी कृषी व संलग्न कार्ये या क्षेत्रावर अवलंबून असल्याने हे क्षेत्र अत्यंत महत्वाचे आहे. या क्षेत्राच्या शाश्वत विकासासाठी जलसंसाधनाचा कार्यक्षम व प्रभावी वापर, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांचे सक्षमीकरण इ. बाबीही महत्वाच्या ठरतात. राज्यातील कृषीपंप ग्राहकांना मा.महाराष्ट्र वीज नियामक आयोगाद्वारे निश्चित केलेल्या वीजदरात राज्य शासनामार्फत सवलत देण्यात येते. सदर सवलतीपोटी महावितरण कंपनीस होणाऱ्या महसुली तुटीची भरपाई शासनामार्फत महावितरण कंपनीस प्रति युनिट अनुदान देऊन करण्यात येते. राज्य शासनाद्वारे देण्यात येणाऱ्या अनुदानाची मर्यादा शासन निर्णय दि.११.१०.२०१२ अन्वये कायम ठेवण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार ऑगस्ट, २०१२ नंतर वीजदरात होणारी वाढ कृषीपंपग्राहकांनी भरावयाची आहे. यानुसार ऑगस्ट, २०१२ नंतर वीजदरात होणाऱ्या वाढीचा भार कृषीपंप ग्राहकांकडून वसूल करण्यात येत आहे.

शेतकऱ्यांचे जीवनमान उंचावण्याकरिता त्यांना कृषी उत्पन्न वाढविण्यास सहाय्य करण्याकरिता शासनाच्या विविध विभागांमार्फत कल्याणकारी योजना राबविण्यात येतात. ऊर्जा विभागामार्फत कृषीपंप ग्राहकांना शासनातर्फे वीज दरात सवलत देण्यात येते.

२. शासन निर्णय दि. ११.१०.२०१२ नुसार ऑगस्ट, २०१२ च्या वीज दर आदेशापर्यंत शासनामार्फत कृषी ग्राहकांना देण्यात येणारी सवलत कायम ठेवण्यात आली आहे. ऑगस्ट, २०१२ पर्यंत शासनामार्फत उच्चदाब उपसा जलसिंचन योजनेतील ग्राहकांना रू. २.१६ प्रति युनिट तसेच स्थिर आकारामध्ये रू. २५ प्रति केव्हीए इतक्या सवलतीच्या अनुषंगाने महावितरण कंपनीस भरपाई देण्यात येत होती व वीजदरातील उर्वरित रक्कम कृषीपंप ग्राहकाने भरावयाची होती.

३. शासन निर्णय दि.३१.०१.२०१९ व शासन निर्णय दि.२५.०८.२०२२ नुसार उच्चदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांनी भरावयाचा दर रु.१.१६ प्रति युनिट व स्थिर आकारामध्ये रू. २५ प्रति केव्हीए इतकी सवलत दि.३१.०३.२०२० व तद्नंतर दि.३१.०३.२०२३ पर्यंत कायम ठेवण्यात आली होती.

त्याचप्रमाणे शासन निर्णय दि.२५.०८.२०२२ नुसार लघुदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांनी भरावयाचा दर रु.१.०० प्रति युनिट व स्थिर आकारामध्ये रू. १५ प्रति अश्वशक्ती प्रति माह इतकी सवलत नव्याने दि.०१.०६.२०२१ ते दि.३१.०३.२०२३ पर्यंत देण्यात आली.

४. सन २०२३ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात दि.०९.०३.२०२३ रोजी अर्थसंकल्प सादर करीत असताना उपसा जलसिंचन योजना ग्राहकांना देण्यात येणाऱ्या वीजदर सवलतीस दि.३१.०३.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येईल अशी घोषणा मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री(वित्त) यांनी केली. सदर घोषणेच्या अनुषंगाने राज्यातील अतिउच्चदाब, उच्चदाब व लघुदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांना वीज दरात सवलत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१) अतिउच्चदाब, उच्चदाब व लघुदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांना देण्यात येणाऱ्या वीजदर सवलत योजनेस दि.३१.०३.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यतादेण्यात येत आहे.

२) त्याअनुषंगाने अतिउच्चदाब व उच्चदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांनी भरावयाचा सवलतीचा दर रु.१.१६ प्रति युनिट व स्थिर आकारामध्ये रु.२५ प्रति KVA प्रति माह इतकी सवलत दि.३१.०३.२०२४ पर्यंत कायम ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) तसेच लघुदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांनी भरावयाचा सवलतीचा दर रु.१.०० प्रति युनिट व स्थिर आकारामध्ये रु.१५/HP/Month इतकी सवलत दि.३१.०३.२०२४ पर्यंत कायम ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) उपरोक्त सवलतीमुळे महावितरण कंपनीस होणाऱ्या महसुली तुटीच्या भरपाईकरिता शासनामार्फत सुमारे रु.६७० कोटी इतके अनुदान महावितरण कंपनीस देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५) उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च लेखाशिर्ष क्र. २८०१५५७२ मधील तरतुदीतून भागविण्यात यावा. याकरिता आवश्यक तरतुद वित्त विभागाद्वारे अर्थसंकल्पित करण्यात यावी.

२. "अतिउच्चदाब, उच्चदाब व लघुदाब उपसा जलसिंचन योजना ग्राहकांना वीज दरात सवलत देणे" ही योजना राबविल्यामुळे शाश्वत विकास ध्येय क्र. २ (Zero Hunger) चे लक्ष्य क्र.२.३ (Double the agriculture productivity) सन २०३० पर्यंत साध्य करण्यास उपयुक्त ठरणार आहे.

३. हा शासन निर्णय मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०८२२१५५६३६२८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARAT ATMARAM PATIL

Digitally signed by BHARAT ATMARAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=0d520baf5ec48b604bc259cb9f458aac1da0b5384b3d866cbc4765f65cfc0b54, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=572A01AB452796E825090804A5E40695BD4FDD036B47479F0A6F8223E0558BF1, cn=BHARAT ATMARAM PATIL
Date: 2023.08.22 15:59:45 +05'30'

**( भरत पाटील )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा .मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१५. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी (नियोजन विभाग),मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.